ॲड.महेश मुळे, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत....
गु.प्र.शा.गु.र.क्र.८६/२०२४ (निर्मलनगर पो.ठा.गु.र.क्र. ५८९/२०२४) या दाखल गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणामधील कामकाजाकरीता.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०१२५/प्र.क्र.१३/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १६ मे, २०२५.

**संदर्भ :** १.पोलीस सह आयुक्त (गुन्हे), मुंबई यांचे पत्र क्र.९२१/पोसहआ/गुन्हे/२०२४,दि.१८.१२.२०२४.
२.शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग, क्र.एसपीपी २०२५/यु.ओ.आर.२३/डी-१४, दि.२८.०४.२०२५.
३.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
४.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय :-**

गु.प्र.शा.गु.र.क्र.८६/२०२४ (निर्मलनगर पो.ठा.गु.र.क्र.५८९/२०२४) या दाखल गुन्ह्यातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी ॲड.महेश मुळे यांची विधि व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन क्र.२ येथील शासन अधिसूचनेन्वये "विशेष सरकारी अभियोक्ता" म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी ॲड.महेश मुळे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा.सत्र न्यायालय, मुंबई व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील कामकाजाकरीता**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त)
आ) विचारविनिमय (प्रतितास) फी - रु.३५,०००/- (अक्षरी रुपये पसतीस हजार फक्त)
(कमाल मर्यादा प्रतिदिन तिन तास)

उपरोक्त नमूद फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड.महेश मुळे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फी चे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा पर्यवेक्षीय अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस अधिकाऱ्यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार आणि संदर्भ क्र. ३ व ४ मधील वित्त विभाग शासन निर्णयानुसार, मा. उच्च

न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१६१७३४५५६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=6ce40b982ce0fd403128e2717e7e0c7b7377fd69d7d23790cb110e33b1e0491e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2025.05.16 17:35:55 +05'30'

**( मुरलीधर मुंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. पोलीस सह आयुक्त (गुन्हे), मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१,महाराष्ट्र, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. विधि व न्याय विभाग (कार्यासन-१४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९. ॲड. महेश मुळे, ऑफीस-धारीया बिल्डींग, ऑफीस नं.५ व ५ ए, १ला मजला, डॉ.डि.एन.रोड, हुतात्मा चौक, फोर्ट, मुंबई-१.
१०. निवड नस्ती (पोल-१०).